**स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाची दि. ०१.०१.१९८९ ते ३१.१२.२०१८ या कालावधीच्या दि.११.१२.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द केलेल्या अंतिम ज्येष्ठता सूचीमध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन शुद्धीपत्रक क्रमांक- ज्येष्ठता-२०२२/प्र. क्र. २७/आस्था-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

दिनांक : २२ एप्रिल, २०२२.

**संदर्भ** - शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. ज्येष्ठता २०२०/प्र.क्र.२४/आस्था-१, दि.११.१२.२०२०.

**प्रस्तावना-**

स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाची दि.०१.०१.१९८९ ते दि.३१.१२.२०१८ या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची दि.११.१२.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आली आहे. श्रीमती सुजाता समाधानराव भातकुले यांच्या सेवा पुस्तकामध्ये त्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर सरळसेवेने दि. ०३.०६.२००८ रोजी हजर झाल्याची नोंद दिसून येते. तथापि, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या दि. ११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये श्रीमती भातकुले यांच्या नावासमोर स्तंभ १० मध्ये दि. ०६.०३.२००८ अशी नोंद घेण्यात आलेली आहे. यास्तव, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या दिनांक ११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये श्रीमती भातकुले यांच्या नियुक्ती दिनांकामध्ये ०६.०३.२००८ ऐवजी ०३.०६.२००८ असा बदल करण्यात येत आहे. त्यानुषंगाने होणा-या बदलाबाबतचे विवरणपत्र परिशिष्ट “ई” यासोबत जोडण्यात आलेले आहे.

२. सदरचे शासन शुध्दीपत्रक श्री.राहुल साळुंखे व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. ८४८/२०१८, संकिर्ण अर्ज क्र.३४४/२०२०, श्री.गोरक्षनाथ आगळे यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. १०५६/२०१९, संकिर्ण अर्ज क्र.३२९/२०२०, श्री.अरविंद लोखंडे व इतर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. ९३५/२०२०, संकिर्ण अर्ज क्र.५८/२०२१, श्री.राजेंद्र माळी व श्री.अरुण रोडगे यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र.३६/२०२१, श्री.सचिन आटकेकर व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबइ येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र.१४०/२०२१ व संकिर्ण अर्ज क्र. ७२/२०२१, श्री.गणेश चव्हाण व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे

दाखल केलेला मूळ अर्ज क्र.१४७/२०२१, श्री.इर्शाद महागमी यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. १६३/२०२१, श्री.भैया रामटेके यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्र. ९४०/२०२०, श्रीमती सारिका श्या. बाभळे, श्रीमती सुजाता एस.भातकुले व श्रीमती वृशाली एस. गारोडे यांनी अनुक्रमे मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेले मूळ अर्ज क्र. ९३०/२०२०, मूळ अर्ज क्र. ११४६/२०२१, मूळ अर्ज क्र. ११४७/२०२१, श्री.आशिष दत्तात्रय कदम व श्री.अमोल चिंतामण नासरे यांनी अनुक्रमे मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेले मूळ अर्ज क्र.८५८/२०२१ व मूळ अर्ज क्र.९७७/२०२१, श्री.गणेश केशवराव चाटे व इतर यांनी व श्री.प्रमोद गोपाळ नरसुडे यांनी अनुक्रमे मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेले मूळ अर्ज क्र. ४९२/२०२१ व मूळ अर्ज क्र. ५८७/२०२१ तसेच इतर सर्व न्यायप्रविष्ट प्रकरणी न्यायनिर्णयांच्या अधीन राहून प्रसिध्द करण्यात येत आहे.

३. सदरचे शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२२०४२२१२५५२१८५१८ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATISH KASHINATH HADPE

Digitally signed by SATISH KASHINATH HADPE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORK DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c5bd45dd711c0d1e07174dcf0c8670425f953a991962687c4be78f5251636a62, pseudonym=A0979EF0CFC5DCCD6992A46DF40B6E6F6DC18F4B, serialNumber=447C8B11201DB56E60BD92A6C6FB60347E6C16EC635920CC8EC2FA918E790339, cn=SATISH KASHINATH HADPE
Date: 2022.04.22 12:58:01 +05'30'

**( सतिश का. हडपे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**सोबत :- परिशिष्ट "ई"**

**प्रत,**

१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती.

२. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.

३. श्रीमती सुजाता समाधानराव भातकुले, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक, द्वारा- अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.

४. कार्यासन अधिकारी सेवा-३/ आस्था-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. निवडनस्ती.

शासन शुध्दीपत्रक क्र.ज्येष्ठता २०२२/ प्र.क्र.२७/ आस्था-१, दिनांक २२.०४.२०२२ चे सहपत्र.

परिशिष्ट - "ई"

शासन परिपत्रक क्र. ज्येष्ठता २०२०/ प्र.क्र.२०/ आस्था-१, दिनांक ११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्य स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गाच्या दि.०१.०१.१९८९ ते दि.३१.१२.२०१८ या कालावधीच्या अंतिम ज्येष्ठतासूची मधील सुधारणाबाबतचे विवरणपत्र.

| अ.क्र. | श्री./ श्रीमती | कर्मचाऱ्याचे नांव | जन्म दिनांक | जात प्रवर्ग | शैक्षणिक अर्हता | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक संवर्गात ज्या पदावरुन आले त्या पदाचे नांव | निम्न पदावरील नियुक्तीचा दिनांक | आस्थापनेचा प्रकार | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक या संवर्गात समावेशन झाल्याचा दिनांक / सरळसेवेने हजर झाल्याचा दिनांक | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक पदाची अर्हताकारी परीक्षा / विभागीय परीक्षा उत्तीर्ण आहे किवा कसे | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक पदाची आर्हताकारी परीक्षा / विभागीय परीक्षा उत्तीर्ण होण्या पासून सूट मिळाली आहे किंवा कसे | सध्याचे मंडळ कार्यालय | जेष्ठतेचा दिनांक | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ |
| २७५७-अ | श्रीमती | सुजाता समाधानराव भातकुले | ०७-०६-१९८८ | अ. जा. | वास्तुशास्त्र आरेखक | सरळसेवा | | नियमित | ०३.०६.२००८ | उत्तीर्ण | | अमरावती | ०८-०६-२०१४ | श्रीमती सुजाता समाधानराव भातकुले यांच्या सेवा पुस्तकामध्ये त्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर सरळसेवेने दि. ०३.०६.२००८ रोजी हजर झाल्याची नोंद दिसून येते. तथापि, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या दि. ११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये श्रीमती भातकुले यांच्या नावासमोर स्तंभ १० मध्ये दि. ०६.०३.२००८ अशी नोंद घेण्यात आलेली आहे. यास्तव, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गाच्या दिनांक ११.१२.२०२० रोजी प्रसिध्द केलेल्या अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये श्रीमती भातकुले यांच्या नियुक्ती दिनांकामध्ये ०६.०३.२००८ ऐवजी ०३.०६.२००८ असा बदल करण्यात येत आहे. श्रीमती भातकुले स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक पदाची विभागीय परीक्षा परीक्षा सन- २०१४ मध्ये पास झालेल्या आहेत. श्रीमती भातकुले यांच्या नियुक्ती दिनांकामध्ये बदल झाल्यामुळे त्यांच्या ज्येष्ठता क्रमांकामध्ये खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे. श्रीमती भातकुले यांच्या नावाचा समावेश २७५७ वरील श्रीमती दैवशाला बस्वराज मोंडे यांच्याखाली व अ. क्र. २७५८ वरील श्रीमती भिमाबाई श्रीरंग गायकवाड यांच्यावर अ. क्र.२७५७-अ येथे करण्यात येत आहे. तसेच श्रीमती भातकुले यांची अ. क्र. २७२७ येथील नोंद रद्द करण्यात येत आहे. |